CR 200408121535 27001
— 1700

महाराष्ट्र रिकाम्या जमिनी (अनधिकृत भोगवटयास प्रतिबंध व तडकाफडकी निष्कासन) अधिनियम १९७५ मध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने अधिनियम पुनर्जिवित करण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्र. एसएलएस-१०९६/प्र.क्र. ४०६१/झोपसु-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १५ फेब्रुवारी, १९९७.

प्रस्तावना :

राज्याच्या नागरी क्षेत्रातील रिकाम्या जमिनीवरील अनधिकृत भोगवटादारांची संख्या झपाटयाने वाढत होती. त्यामुळे अशा क्षेत्रातील रहिवाश्यांचे आरोग्य व स्वच्छता आणि शांततामय जीवन जगण्यास गंभीर धोका निर्माण झाला होता. ही बाब लक्षात घेऊन राज्याच्या नागरी क्षेत्रातील रिकाम्या जमिनीच्या अनधिकृत भोगवटयास प्रतिबंध करण्यासाठी आणि जमिनीवरून अनधिकृत व्यक्तींना तडकाफडकी निष्कासीत करण्यासाठी व त्यांच्याशी संबंधित बाबींची तरतूद करण्याची आवश्यकता विचारात घेऊन शासनाने महाराष्ट्र रिकाम्या जमिनी (अनधिकृत भोगवटयास प्रतिबंध व तडकाफडकी निष्कासन) अधिनियम, १९७५ हे अंमलात आणले. आवश्यकतेनुसार या अधिनियमामध्ये १९७६ आणि १९७७ साली दुरुस्तीही करण्यात आली.

तथापि, या अधिनियमाच्या वैधतेबाबत काही लोकांनी मा.उच्च न्यायालयात याचिका क्र. १३४०/७७ अन्वये दाखल केली. या याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.८ फेब्रुवारी, १९८० रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सदर कायदा रद्दबातल ठरविण्यात आला. मा.उच्च न्यायालयाच्या ह्या निर्णयाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात शासनाने अपील केले होते. तथापि, मा.सर्वोच्च न्यायालयानेही मा.उच्च न्यायालयाने दिलेला निर्णय कायम करुन ह्या अधिनियमामध्ये काही सुधारणा सुचवून त्यानुसार सदर कायदा अंमलात आणता येईल असा निर्वाळा दिलेला आहे.

मा.सर्वोच्च न्यायालयाने सुचविलेल्या सूचनांच्या अनुषंगाने प्रस्तुत कायद्यात असलेल्या तरतुदींत बदल करुन महाराष्ट्र रिकाम्या जमिनी (अनधिकृत भोगवटयास प्रतिबंध व तडकाफडकी निष्कासन) अधिनियम, १९७५ पुनर्जिवीत करण्याचा आणि सदरहू अधिनियम, पुनर्जिवीत करण्याच्या दृष्टीने शासनास सूचना करण्यासाठी एक समिती गठीत करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधिन होता.

शासनास सूचना
निष्कासन अधिनियम, १९७५ पुनर्जीवित करण्यासंबंधाने
करण्यासाठी तसेच अधिनियमाचा सुधारीत मसुदा तयार करण्यासाठी
मा. अतिरिक्त मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली
खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

अतिरिक्त मुख्य सचिव, सा.प्र.वि., अध्यक्ष.
१) श्री.आर.सी.अय्यर, सदस्य.
२) प्रधान सचिव(महसूल व वन विभाग) सदस्य.
३) प्रधान सचिव(नगर विकास) सदस्य.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण. सदस्य.
५) अतिरिक्त आयुक्त, मनपा, मुंबई.
६) सचिव, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई, सदस्य.
सदस्य.
७) जिल्हाधिकारी, मुंबई(शहर) सदस्य.
८) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा
९) सक्षम प्राधिकारी, नागरी जमिन कमाल धारणा, मुंबई सदस्य.
१०) सह सचिव, नागरी जमिन कमाल धारणा, गृ.नि.व सदस्य.
गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
सदस्य सचिव
११) उप सचिव, गृ.नि.व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई सदस्य.
१२) अ) अतिरिक्त जिल्हाधिकारी(अति.), मुंबई सदस्य
१२) नियंत्रक, अतिक्रमणे व अनाधिकृत बांधकामे, मुंबई
१३) संचालक, नगरपालिका प्रशासन, नवीन प्रशासन भवन, मुंबई, सदस्य

वरील समितीने आपला अहवाल आणि अधिनियमाचा सुधारीत
मसुदा तीन महिन्यांत शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( वि.स.कोकणे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :
मा. मंत्री(गृ.नि.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
मा. राज्यमंत्री(गृ.नि.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
श्री.आर.सी.अय्यर, अतिरिक्त मुख्य सचिव, सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव(महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई ३२.
प्रधान सचिव(नगर विकास), मंत्रालय, मुंबई ३२.
मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई.
अतिरिक्त आयुक्त, मनपा, मुंबई.
विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.